अमरावती जिल्हयातील मेळघाट भागातील १० प्राथमिक आरोग्य केंद्रामध्ये कायमस्वरुपी विद्युत पुरवठयाची सोय उपलब्ध करण्यासाठी जनरेटर व जनरेटरच्या बॅटरी खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२३/प्र.क्र.१०९/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १९ जून, २०२३.

**वाचा :**

१) **सहसंचालक आरोग्य सेवा (प्रा.आ.केंद्र-जि.प.स्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक-आआसे/कक्ष-७अ/टे-२/नस्ती क्र.२०/मा.मंत्री निर्देश/मेळघाट/Generator खरेदी/१४११-१६/२०२३ दि.०६.०३.२०२३**

**प्रस्तावना :**

अमरावती जिल्हयातील मेळघाट भागातील १० प्राथमिक आरोग्य केंद्रामध्ये २४ तास कायमस्वरुपी विद्युत पुरवठयाची सोय उपलब्ध करण्यासाठी जनरेटर खरेदीसाठी आणि एक प्राथमिक आरोग्य केंद्रातील जनरेटरची बॅटरी खरेदी करण्यासाठी एकूण रु.६२,४५,४८०/- इतक्या किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. या बाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

अमरावती जिल्हयातील मेळघाट भागातील १० प्राथमिक आरोग्य केंद्रामध्ये २४ तास कायमस्वरुपी विद्युत पुरवठयाची सोय उपलब्ध करण्यासाठी जनरेटर खरेदीसाठी तसेच एक प्राथमिक आरोग्य केंद्रातील जनरेटरची बॅटरी खरेदी करण्यासाठी रु.६२,४५,४८०/- इतक्या किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा तपशिल पुढील प्रमाणे आहे.

| Generator Estimate Price | Basic Price per generator | Other Charges (Transportation, Loading, unloading, cable work, change over switch, foundation Earthling, installation and commissioning | Total Cost without GST per Generator | Total Cost with GST 18% per Generator | No. of Institutes | Total |
|---|---|---|---|---|---|---|
| 15 KVA Generator | 3,18,600/- | 2,10,000/- | 5,28,600/- | 6,23,748/- | 10 | 62,37,480/- |
| Battery 12 V 80 AH | | | | | 1 | 8,000/- |
| **Total Cost** | | | | | | **62,45,480/-** |

सदरील प्रस्तावातील १० प्राथमिक आरोग्य केंद्रे पुढील प्रमाणे आहेत.

| अ.क्र. | प्रा.आ.केंद्राचे नाव | तपशिल |
|---|---|---|
| १ | सलोना | जनरेटर क्षमता १५ KVA for Full Load बसविणे. |
| २ | काटकुंभ | |
| ३ | हतरू | |
| ४ | सेमाडोह | |
| ५ | टेबुसोडा | |
| ६ | बैरागड | |
| ७ | बिजुधावडी | |
| ८ | कळमखार | |
| ९ | साद्राबाडी | |
| १० | धूळघाट रे. | |
| ११ | हरिसाल | जनरेटरची बॅटरी क्षमता १२V ८०AH बसविणे. |

२. सदर प्राथमिक आरोग्य केंद्रास जनेरटर उपलब्ध झाल्यास त्याकरीता आवश्यक असणाऱ्या इंधनाकरीता प्रतिवर्षी रु.२,६४,०००/- इतका खर्च अपेक्षित आहे. सदर आवर्ती खर्च तसेच जनरेटरची नवीन खरेदीबाबतचा खर्च मागणी क्र.आर-१, लेखाशिर्ष- २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०२) (०८) प्राथमिक आरोग्य केंद्रे (स्थानिक क्षेत्रे) ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर २२१०५०४१ मधून भागविण्यात यावा.

३. सदर खरेदी करतांना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

1) सदर खरेदीची प्रक्रिया पूर्ण करण्यासाठी जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती यांना प्राधिकृत करण्यात यावे.
2) जनरेटरची खरेदी Government e-market Place (GeM) Portal of DGS&D या पोर्टलवर किंवा ई- बाजारातून खुल्या निविदेद्वारे करण्यात यावी. सदर खरेदी करतांना उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दिनांक ०१.१२.२०१६, दि.२४.०८.२०१७ व दि.०७.०५.२०२१ मधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
3) सदर खरेदी करण्यापूर्वी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील खरेदी समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे.

४. उपरोक्त अटी व शर्ती बरोबरच सदर खरेदी करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिका-यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१९१४५९०३९३१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: CN = ASHOK MAROTI ATRAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH DEPARTMENT
Date: 2023.06.19 16:38:13 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, अमरावती.
४. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
५. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालय राज्यस्तर), मुंबई.
६. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अमरावती.
८. जिल्हा कोषागार अधिकारी,जिल्हा अमरावती.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३).